# इस्लामचा परिचय

लेखक

**वहिदुद्दीन खान**

अनुवाद

**सय्यद जाकिर अली**

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

(आर्य समाज स्युहारा, जिल्हा बिजनौर तर्फे ६४ वे समारोहप्रसंगी १९५९ साली नोव्हेंबर महिन्याच्या शेवटी सप्ताह साजरा करण्यात आला. याप्रसंगी २९ नोव्हेंबर रोजी एक सर्वसाधारण धार्मिक सभा संपन्न झाली. या सभेत विविध धर्मांच्या विचारवंतांनी आपापले विचार व्यक्त केले. हा लेख याच अंतिम सभेत वाचण्यात आलेला आहे.)

या समस्त जगाची निर्मिती ईश्वरानेच केली असून तोच या जगाचा खरा स्वामी व प्रभु आहे. ईश्वराने एका विशेष योजनेनुसार आपणा सर्वांना निर्माण केले, अस्तित्व प्रदान केले. या योजनेची तंतोतंत माहिती तो आपल्या विशेष आणि निवडक मानवांद्वारे आपणांस देतो. या मानवांना इस्लामी परिभाषेत पैगंबर अर्थात प्रेषित असे म्हणतात. पैगंबर मुहम्मद (स.) या पैगंबरशृंखलेची अंतिम कडी आहेत. जगाला पैगंबर मुहम्मद (स.) यांचे अनुकरण करणे आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचा संदेश प्राप्त झाल्यानंतर जो माणूस अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांचा संदेश नाकारतो, तो केवळ त्यांच्या एकट्याचाच संदेश नाकारत नसून वस्तुत: ईश्वराच्या समस्त पैगंबरांचा संदेश नाकारतो. असा माणूस काफिर (नाकारणारा), ईश्वराचा अवज्ञाकारी असतो. ईश्वराच्या समस्त कृपा आणि अनुग्रहात त्याचा कुठलाही वाटा नसतो.

## ईश्वराचे अस्तित्व

सर्वप्रथम आपण हा विषय चर्चेवर घेऊ या की 'या जगाचा एकमेव स्वामी व प्रभु ईश्वरच आहे.' काहीजणांची यावर सहमती नाही. त्यांची अशी विचारसरणी आहे की समस्त विश्वरुपी कारखाना अगर ब्रह्मांड आकस्मिक आणि योगायोगाने अस्तित्वात आलेले असून त्याचे कार्य आपोआपच सुरु आहे.

'हक्सले'सारख्या विचारवंताने याविषयी उदाहरणात म्हटले आहे, "सहा माकडे एक-एक टाईपरायटर घेऊन बसले आणि कोट्यवधी वर्षांपर्यंत वाटेल तशी त्यावर बोटे आदळत राहिले. यातून त्यांच्या हातून उलट्यापालट्या टाईप झालेल्या कागदांच्या प्रचंड ढिगाऱ्यातून एखाद्या कागदावर शेक्सपीयरची कविता निघाली. याचप्रमाणे कोट्यवधी वर्षांपर्यंत भूतद्रव्याच्या स्वैर वा अंध क्रियेतून अगदी योगायोगाने हे प्रचंड ब्रह्मांड अस्तित्वात आले." वास्तविकता अशी आहे की 'संयोग' अर्थात 'योगायोग' अथवा 'घटना' या दोन्ही बाबींचे स्वत:चे कोणतेही अस्तित्व नाही. याचाच अर्थ असा होतो की "ज्या बाबींना स्वतंत्र कोणतेही अस्तित्व नसते, त्या इतरांना अस्तित्व प्रदान करुच शकत

नाहीत,'' हे स्पष्ट. या विश्वाविषयी करण्यात येणारी ही व्याख्या पूर्णतः निराधार आहे. या व्याख्येचा बुद्धी आणि विवेकाशी कुठल्याही प्रकारचा संबंध नाही. जगाच्या निर्मितीत याचा काही संबंध नाही.

याउलट ईश्वराची धारणा हीच या जगाच्या व्याख्येशी पूर्णतः अनुकूल आणि साम्य असलेली वाटते. हे आकस्मित आणि संयोगवश अस्तित्वात आले असेल, अशी कल्पनादेखील करणे शक्य नाही. या पृथ्वीवर सजीव सृष्टीसाठी ज्या परिस्थितीची गरज असते, ती पूर्णतः अनुकूल आहे. सजीव सृष्टीच्या संरक्षण आणि विकासासाठी आवश्यक असलेली एक एक वस्तू येथे पुरविण्यात आलेली आहे. ही पृथ्वी आपल्या भ्रमणकेंद्राभोवती हजार मैल प्रति तासाच्या वेगाने भोवऱ्याप्रमाणे फिरत आहे. जर पृथ्वीचा वेग दर ताशी शंभर मैल असता तर रात्र व दिवसाचा कालावधी दहा पटीने वाढला असता. परिणामी पृथ्वीवरील वनस्पती आणि शेतातील पिके उन्हाने करपून गेली असती आणि उर्वरित वनस्पती रात्रीच्या गारठ्याने नष्ट झाली असती.

समस्त सृष्टीच्या जीवनाचा मुख्य स्त्रोत सूर्य हा १२ हजार डिग्री फॅरनहाइट इतक्या अतिप्रचंड उष्णतेने तापत आहे. हे तापमान इतके प्रचंड आहे की असंख्य प्रचंड पर्वतसुद्धा यात जळून भस्म होतील. मात्र हाच सूर्य आपल्या या पृथ्वीपासून अशा उचित अंतरावर आहे की समस्त सृष्टीचा विकास आणि वृद्धीच्या गरजेपेक्षा जास्त तापमान देऊ शकत नाही. सूर्य जर सध्याच्या अंतरापेक्षा दुप्पट अंतरावर गेला तर आपण सगळेच बर्फात रुपांतरीत होऊ आणि याउलट निम्मा जवळ आला तर आपणा सर्वांना व वनस्पतींचा कोळसा होऊन जाईल.

आपली गोलाकार पृथ्वी या वायुमंडलात सरळ उभी नसून २३ अंशाच्या कोनामध्ये एकीकडे झुकलेली आहे. हेच कलणे आपल्याला वेगवेगळे ऋतु देत असतो. हा कल नसता तर समुद्रातून निघणारी वाफ सरळ उत्तर किंवा दक्षिणेस जाऊन आमच्या महाद्वीपांवर बर्फांचे आच्छादन पडले असते.

चंद्र आपल्या पृथ्वीपासून सुमारे २.५ लाख मैलांच्या अंतरावर आहे. जर हे अंतर एक लाख मैलाचे असते तर समुद्रात भरती-ओहोटीच्या लाटा इतक्या उंच असत्या की पृथ्वीवरील पूर्ण खुश्कीचा प्रदेश दिवसातून दोनवेळा समुद्राच्या पाण्याखाली गेला असता. तसेच मोठमोठे पर्वत उसळणाऱ्या लाटांच्या टकरीमुळे घासून घासून नष्ट झाले असते. सृष्टीच्या नियोजनबद्ध कार्याची अशी असंख्य उदाहरणे देता येतील. आपल्या दृश्य भूतलावरील या काही अतिसाधारण घटनाच आपले लक्ष वेधून घेतात. याशिवाय आणखी अगणित घटना आहेत आणि त्या अगदी स्पष्ट करतात की आपल्या पृथ्वीशी यांचा संबंध काही योगायोग असूच शकत नाही. या घटना निश्चितच कोणीतरी अस्तित्वात आणत असून

सुव्यवस्थितपणे सातत्य ठेवीत आहे.

ही संपूर्ण सृष्टी इतकी सुव्यवस्थित आणि सुसंगठित आहे की आपण जेव्हा एखाद्या घटनेचे वर्णन करीत असतो, तेव्हा खरे पाहता तिला आपण मर्यादित करीत असतो. या जगाच्या एक एक कणांमध्ये नीति, सुव्यवस्था आणि ज्ञानांचे इतके बहुमोल आणि प्रचंड खजिने आहेत की जेव्हा जेव्हा आपण यांचा उल्लेख करतो तेव्हा आपल्याला हे कळून चुकते की आपण महात्म्य वर्णन करण्यात खूपच असमर्थ आहोत. आपण आपल्या मुखाने अगर वक्तृत्वसामर्थ्याने त्याचे खऱ्या अर्थाने वर्णनच करु शकत नाही. अशा आश्चर्यकारक सृष्टीस ईश्वराची निर्मिती असल्याचे मनोभावाने स्वीकारणे जर कुणास बुद्धिमत्तेविरुद्ध वाटत असेल आणि यापेक्षाही असे समजतो की ही अत्यंत नियोजनबद्ध सृष्टी ईश्वराशिवायच अस्तित्वात आहे आणि चालत आहे, खरे तर हे बुद्धिमत्तेविरुद्ध आहे.

काहींच्या मते जर सारे ब्रह्मांड ईश्वराने निर्माण केले असेल तर मग त्याला कोणी निर्माण केले? मात्र हा एक असा प्रश्न आहे जो आपण ईश्वरास मानो अथवा न मानो, निर्माण होतो.

आपल्याला एकतर ईश्वरास मानावे लागते किंवा सृष्टीस मानावे लागते. आपल्या डोळ्यांसमोर एक विशाल जगत असून ते आपण स्वत: पाहतो व अनुभवतो. म्हणून सृष्टी आपल्याला अमान्य करुन चालणार नाही. मग आपण एकतर असे म्हणू शकतो की ही सृष्टी आपोआपच अस्तित्वात आली अथवा एखाद्या अफाट शक्ती किंवा सत्तेने या सृष्टीची निर्मिती केली आहे. या दोन्ही बाबींपैकी एक बाब स्वीकारणे आपल्याला गरजेचे आहे. मग या सृष्टीची निर्मिती एका प्रचंड सत्ता आणि शक्तीनेच केली आहे, असे स्वीकारण्यात कोणती अडचण आहे? कारण हे तथ्य स्वीकारण्यामुळे आपल्या समस्त प्रश्नांचे समाधान होऊ शकते. याउलट सृष्टी ही आपोआपच निर्माण झाल्याचे मान्य केल्यास आपल्या कोणत्याही प्रश्नाचे वा अडचणीचे समाधान होत नाही. आपल्या मनमस्तिष्कात उभा राहणारा प्रत्येक प्रश्न निरुत्तरित राहतो.

काहीजण दार्शनिक तत्त्वज्ञानाच्या माध्यमातून हे सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत असतात की ही सृष्टी मिथ्या आहे. सर्वकाही आपला भ्रम आहे. मात्र जी व्यक्ती असा दावा करते, त्याचवेळी ती सृष्टीच्या अस्तित्वाचा स्वीकारदेखील करते. हा प्रश्नच का निर्माण होतो की हे सृष्टीनिर्माण मुळात अस्तित्वहीन आहे. कारण एखाद्या गोष्टीचे अस्तित्व असल्यामुळेच त्याविषयी प्रश्न निर्माण होतात. अशाप्रकारे भ्रमवादाचे हे गृहितक एकाच वेळी मानव आणि सृष्टी या दोहोंचा स्वीकार करण्यास बाध्य करते.

## ईश्वराशी आपला संबंध

या ठिकाणी ईश्वराचा स्वीकार केल्यावर सर्वप्रथम हा प्रश्न निर्माण होतो की, मग ईश्वराशी आपला संबंध काय? पन्नास वर्षांपूर्वी हा विचार समोर आला होता की ईश्वराचे अस्तित्व मान्य जरी केले तरी त्याच्याशी आपला काहीही संबंध असू शकत नाही. मात्र आधुनिक क्वांटम सिद्धान्ताच्या आधारे विज्ञानाने या विचाराचे खंडन केले आहे. पूर्वी असे समजण्यात येत असे की सृष्टी हे एक यंत्र आहे. हे एकदा सुरु करण्यात आले व सतत चालू आहे. या विचारसरणीवर वैज्ञानिकांचा प्रचंड विश्वास होता की एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात बर्लिनचे प्राध्यापक मॅक्स प्लॅन्क यांनी प्रकाशाच्या काही अशा व्याख्या जगासमोर मांडल्या, ज्यामुळे सृष्टी हे एक यंत्र असण्याच्या सिद्धान्ताचे खंडन होऊ लागले, तेव्हा त्यांच्यावर तीव्र आक्षेप घेण्यात येऊ लागले, त्यांची टर उडविण्यात येऊ लागली. मात्र प्रा. मॅक्स प्लॅन्क यांच्या व्याख्या आणि सिद्धान्तांना प्रचंड प्रसिद्धी व मान्यता मिळाली आणि यात सतत प्रगती होत होत आधुनिक क्वांटम सिद्धान्ताच्या स्वरुपात आज भौतिकशास्त्राच्या महत्त्वपूर्ण सिद्धान्तात याची गणना होते. (मॉडर्न सायंटिफिक थॉट्स, पृ. १२-२०)

प्रा. मॅक्स प्लॅन्क यांचा प्रारंभिक रुपात सिद्धान्त हा होता की प्रकृती उसळी घेऊन क्रियाशील होते. इ. सन १९१७ मध्ये अल्बर्ट आइन्स्टाइन यांनी हे स्पष्ट केले की प्रा. मॅक्स प्लॅन्क यांचा सिद्धान्त केवळ अनिरंतरता सिद्ध करीत नसून यामुळे अधिक क्रांतीमय परिणाम समोर येतात. हे कार्यकारण या नियमास त्यांच्या त्या उच्च स्थानापासून विभक्त करीत आहे, जे यापूर्वी प्राकृतिक जगाच्या समस्त घटनांचे एकमात्र पथदर्शक समजण्यात येत असे. प्राचीन विज्ञानाने पूर्ण विश्वासाने ही घोषणा केली होती की निसर्ग अथवा प्रकृती केवळ एकाच मार्गाचा अवलंब करु शकते, जो कारण आणि परिणामांच्या अनुसार निश्चित असतो. मात्र आता हे माहीत झाले की हे एकमात्र अपूर्ण ज्ञानाचे फलित आहे. पूर्वी असे म्हटले जात होते की ईश्वराला जर मानायचेच असेल तर त्यास प्रथम कारणाच्या स्वरुपात मानावे अन्यथा आज या सृष्टीला ईश्वराची गरजच नाही. मात्र आज हे स्पष्ट आहे की सृष्टीस केवळ पहिल्या वेळेस गतिमान होण्यासाठी एका संचालकाची गरज आहेच व यापेक्षाही जास्त हे की ही सृष्टी प्रत्येक क्षणी गतिमान ठेवण्यासाठीसुद्धा गरज आहे. क्वांटम सिद्धान्तातून दुसऱ्या शब्दांत हेच स्पष्ट होते की ही सृष्टी एक स्वयंचलित यंत्र नसून ती प्रतिक्षणी चालविण्यात येत आहे. अर्थातच एका जीवित आणि स्थायी सत्तेच्या कृपेने हे सर्वकाही चालत आहे. त्याचप्रमाणे एका क्षणापुरती जरी त्याने आपली कृपा काढून घेतली तर समस्त सृष्टी अदृश्य होऊन दर्शकांसमोर फक्त पांढरा पडदा तेवढा शिल्लक राहतो. अर्थात या विश्वाचा एकूण एक कण आपल्या अस्तित्व आणि क्रियाशील राहण्यासाठी प्रत्येक क्षणी सर्वशक्तिमान ईश्वराच्या आज्ञेचा इच्छुक असून याशिवाय तो टिकूच शकत

नाही.

ब्रह्मांडाचा स्वामी ईश्वराशी असलेला हा मूळ संबंध स्पष्ट करतो की मनुष्याशी त्याचा नेमका काय संबंध असावयास हवा. ज्याने आपल्याला अस्तित्व प्रदान केले, आपल्या गरजांची पूर्तता केली आणि प्रत्येक क्षणा आपले पालनपोषण करीत आहे, त्या ईश्वराचा हा अनिवार्य अधिकार आहे की आपण त्याचे श्रेष्ठत्व, स्वामित्व आणि प्रभुत्व स्वीकारुन त्याचे दासत्व स्वीकारावे, आपले सर्वस्व त्यास अर्पण करावे. माणसाला जी जीवनव्यवस्था ज्ञात आहे त्यात सर्वांत जास्त स्पष्ट आणि महत्त्वपूर्ण आचरण हे आहे की उपकार करणाऱ्याच्या उपकाराची जाणीव ठेवावी. उपकार करणाऱ्याने जरी जाणीव करुन दिली नसली तरी आपण स्वत:हून याची जाण ठेवावी. याचा अर्थ असा होतो की ईश्वरास जर आपण ईश्वर समजत असू तर त्याचे ईशत्वसुद्धा स्वीकारावे लागेल आणि त्याची प्रसन्नता व मर्जी प्राप्त करणे हेच आपल्या जीवनाचे उद्दिष्ट ठरते. माणसाने ईश्वराच्याच आज्ञेनुसार आपले जीवन जगणे आवश्यक आहे आणि याकरिता आणखी इतर कोणत्याही पुराव्याची गरज नाही.

मात्र हा विषय इथेच संपत नाही. आपण ईश्वराचे ईशत्व स्वीकारुन त्याचे दासत्व मान्य करतो ते यासाठी की आपल्यासमक्ष सत्य प्रकट झाले. खरी गोष्ट अशी आहे की आपल्यासमोर याशिवाय इतर पर्यायदेखील नाही. कारण आपल्याला जे काही मिळते आणि मिळणार ते त्याच्याचकडून. इतर कोणीही आपल्याला काहीच देऊ शकत नाही. म्हणजेच आपल्या जीवनाच्या साऱ्या समस्या व अडचणींचा संबंध ईश्वराशीच आहे. आपण या सृष्टीत इतके दुर्बल विवश आहोत की ईशकृपेशिवाय एक क्षणसुद्धा आपण आपले अस्तित्व बाकी ठेवू शकत नाही. मग अल्लाहला सोडून जाणार कोठे?

जरा विचार करा, भारताच्या उत्तरेकडील सीमेवर अडीच हजार मैल लांबीचा हिमालय पर्वत कोणी तयार केला? आपण केला की ईश्वराने? जर हिमालय पर्वत नसता तर बंगालच्या खाडीतून उठणारे दक्षिण-पूर्व वारे जे दरवर्षी आपल्याकरिता पाऊस आणतात, हे वारे आपल्याकडील पाऊस सरळ रशियाकडे घेऊन गेले असते आणि परिणामी पूर्ण उत्तर भागात मंगोलियासारखे वाळवंट झाले असते.

आपल्याला माहीत आहे की सूर्य आपल्या असाधारण आकर्षणशक्तीने पृथ्वीस ओढत आहे. तसेच पृथ्वी एका केंद्रीय बलाद्वारे स्वत:ला त्याच्या विरुद्ध बाजूने खेचत आहे. अशाप्रकारे तो सूर्यापासून स्वत:स एका विशिष्ट अंतरावर ठेवून आपले अस्तित्व बाकी ठेवते. जर एखाद्या दिवशी पृथ्वीचे हे बळ संपले तर ती जवळपास ६००० मैल प्रति तासाच्या वेगाने सूर्याकडे जाईल आणि एखाद्या प्रचंड मोठ्या भट्टीत एखाद्या दाण्यासारखी ही सूर्यात जाऊन पडेल. यावरुन स्पष्ट होते की या सूर्य व पृथ्वीला प्राप्त असलेली शक्ती निर्मात्या ईश्वरानेच प्रदान केलेली आहे.

सृष्टीच्या ज्या भागात आपण राहतो, त्या भागाचे नाव सौरमंडळ असे आहे. खूप दूर जाऊन याचे निरीक्षण केल्यास असे आढळून येईल की अथांग पोकळीमध्ये एक आगीचा गोळा जळत असून तो पृथ्वीपेक्षा १३ लक्ष पटीने मोठा आहे, ज्यातून इतके मोठमोठे आगीचे गोळे बाहेर पडतात जे प्रत्येक लक्ष मैलापर्यंत वायूमंडळात फेकले जातात. याच प्रचंड आगीच्या गोळ्याला सूर्य म्हणतात. मग जरा त्या ग्रहांनासुद्धा पाहा जे सूर्यापासून कोट्यवधी मैल लांब अंतरावर सूर्यमंडळात भ्रमण करीत आहेत. जवळपास २५ हजार मैलाचा परिघ असलेली आपली पृथ्वी या भ्रमणविश्वात लहान जग आहे. ही आपली सौर व्यवस्था दिसायला अत्यंत प्रचंड वाटते. मात्र ही प्रचंड सूर्यमालासुद्धा संपूर्ण सृष्टीच्या तुलनेत एक कणच आहे. कारण याच सृष्टीत इतके मोठमोठे तारे आहेत की अगदी एकाच ताऱ्यावर आपले हे अफाट आणि प्रचंड मोठे सौरमंडल ठेवता येईल. या अनंत आणि असीम सृष्टीमध्ये आपली पृथ्वी ही वायुमंडळात उडणाऱ्या एका कणापेक्षाही सामान्य आहे.

या अतिविशाल सृष्टीत आपला एक दर्जा आहे. थोडा जर विचार केला तर हे स्पष्ट होईल की आपण किती सूक्ष्म आहोत. यामुळे बाह्य शक्तीपासून बचाव करण्यात आपण किती असमर्थ आहोत. अर्थात आपण आपल्या अस्तित्वाच्या रक्षणासाठी जगाचा निर्माता व स्वामी ईश्वराचीच मदत मागण्याशिवाय काय करु शकतो? ज्याप्रमाणे एका लहान बाळाचे अख्खे विश्व माता-पिताच असतात. त्याचे पूर्ण जीवन, त्याच्या गरजांची पूर्तता आणि त्याच्या भविष्याचा आश्रय पूर्णपणे माता-पित्यावर अवलंबून असतो. तसेच मानव यापेक्षा कितीतरी पटीने आपल्या पालनकर्त्या ईश्वरावरच अवलंबून आहे. ईश्वराची मदत आणि त्याच्या मार्गदर्शनाशिवाय स्वत:करिता कोणत्याही बाबतीत विचारसुद्धा करु शकत नाही. तोच आपला आश्रय असून आपण त्याच्याकडेच रुजू व्हायला हवे.

या सविस्तर चर्चेनंतर हे स्पष्ट होते की मानवास ईश्वराच्या मार्गदर्शनाची नितांत आवश्यकता आहे. ईश्वराकडून मानवाचा हाच दर्जा निश्चित असून स्वत: मनुष्याकडे याशिवाय कुठलाही पर्याय राहात नाही की त्याने ईश्वराचीच मदत आणि मार्गदर्शन मागावे.

## ज्ञानप्राप्ती

आपल्या सभोवताली दिसणाऱ्या जगाबद्दल विचार केल्यास लक्षात येईल की या समस्त जगाच्या निर्मात्या ईश्वराने निर्माण केलेल्या वस्तूंना त्याच्या मदत आणि मार्गदर्शनाची गरज आहे आणि ईश्वरातर्फे मदत आणि मार्गदर्शनाची ही प्रक्रिया सतत चालू आहे. ज्याला ज्या वस्तूंची गरज आहे, ती पोचत आहे. मूल जन्माला येण्यापूर्वीच त्याच्या मातेच्या छातीत त्यास आवश्यक असलेल्या दुधाची निर्मिती होते आणि निरागस बाळ कोणत्याही प्रकारच्या शिक्षण-प्रशिक्षणाशिवाय जन्मताच मातेच्या छातीला तोंड लावून स्तनपान करते.

आणखीन एक उदाहरण सांगायचे असल्यास 'एल' माशाचे उदाहरण देता येईल. हे विचित्र मासे आपल्या तारुण्यातच ठिकठिकाणच्या जलाशय आणि नद्यांतून निघून बर्मुडा द्वीपकल्पाजवळील समुद्रात खोल तळात जाऊन बसतात. यूरोपमधील हे एल मासे अटलांटिकमधून ३००० मैलाचा प्रवास करुन येथे पोचतात आणि तेथेच हे मासे आपल्या पिलांना जन्म देऊन मरतात. जेव्हा ही पिल्ले डोळे उघडतात तेव्हा ते एका अपरिचित जलाशयात असतात. आता पुढील आयुष्य जगण्यासाठी माहीत करण्याचे कोणतेच साधन त्यांच्याकडे नसते. मात्र ते कोणत्याही शिक्षण-प्रशिक्षणाशिवाय त्या त्या ठिकाणी पोचतात, जिथून त्यांचे माता-पिता आले होते. हेच कारण आहे की कोणत्याही जलाशयातून एल मासे कायमचे गायब होत नाहीत. तसेच हे सर्वकाही अशाप्रकारे होते की अमेरिकेचे कोणतेही एल यूरोपात सापडत नाहीत आणि यूरोपातील कोणतेही एल अमेरिकेत सापडत नाहीत. मग या पिल्लांना हे कसे समजते की त्यांचे माता-पिता याच ठिकाणाहून आले होते आणि आपणांसही याच ठिकाणी जावयाचे आहे? अर्थात हे मार्गदर्शन त्यांना ईशप्रकाशनाद्वारे प्राप्त होते. ईशप्रकाशना (वह्य) म्हणजे ईश्वर आणि त्याच्या सृष्टीदरम्यान संदेश पोहोचविण्याचे कार्य होय. एखाद्या प्राण्याने वा सजीवाने जीवन जगण्यासाठी काय करावे आणि सृष्टीच्या निर्मात्याने त्याच्या सामूहिक योजनेनुसार जे काम सोपविले ते कशाप्रकारे पूर्ण करावे, हेच दाखवण्याचे नाव मुळात ईशप्रकाशना होय. या ईशप्रकाशनांचे दोन प्रकार आहेत. प्रथम प्रकारचा संबंध हा मनुष्याव्यतिरिक्त अन्य बाबीशी आहे आणि दुसरा प्रकार हा स्वत: मनुष्याशी संबंधित आहे.

मनुष्याव्यतिरिक्त जेवढ्या सजीव वस्तू या भूतलावर आहेत, त्या सर्वच्या सर्व इच्छाहीन असून त्यांचे कोणतेही कार्य कोणत्याही इच्छेनुसार नसते. त्यांचे प्रत्येक कार्य स्वाभाविक प्रवृत्तीनुसार होत असते. यालाच आपण स्वभाव अथवा निसर्गप्रवृत्ती म्हणून ओळखतो. जणू ही सर्वकाही सजीव यंत्रेच आहेत जी आपल्या मर्यादांच्या आत आपले ठराविक कार्य करतात. अशाप्रकारे या सजीवांना हा प्रश्नच पडत नाही की काय करायचे व काय नाही. या सजीवांकडे जी ईशप्रकाशना येते ती आदेशाच्या स्वरुपात येत नसून स्वभावाच्या स्वरुपात येते. त्यांची पूर्ण रचनाच मुळी अशी आहे की त्यांनी एकच विशेष कार्य वारंवार करीत राहावे. मात्र या संपूर्ण विश्वात मनुष्य नावाचा जो जीव आहे, त्याला निर्णय घेण्याची क्षमता आहे. हा आपल्या योजनेनुसार कार्य पार पाडतो. उद्दिष्टाशिवाय कोणतेही कार्य करीत नाही. जेव्हा एखादे कार्य सुरु करतो तेव्हा तो मध्येच एखाद्या उद्दिष्टाशिवाय कार्य बंद करीत नाही. यावरुन लक्षात येते की मनुष्य इतर निर्मितीप्रमाणेच ईश्वराचा दास असूनदेखील त्याला परीक्षेच्या अवस्थेत ठेवण्यात आलेले आहे. जे काम दुसऱ्या सजीव सृष्टीकडून स्वभावानुसार घेण्यात येत आहे, तेच काम मनुष्यास मात्र त्याच्या

हेतूनुसार करावे लागते. अर्थात इतर निर्मिती परीक्षावस्थेत नसून केवळ मानव हाच परीक्षावस्थेत आहे. मनुष्याव्यतिरिक्त समस्त सजीवांना त्यांच्या स्वभावानुसार ईशप्रकाशना होते पण मनुष्याला प्राप्त होणारी ईशप्रकाशना ही आदेशाच्या स्वरुपात होते. सामान्य सजीवांना कोणते काम कधी व कशा रितीने करावयाचे आहे हे त्यांच्या जन्मजात निसर्गस्वभावानुसार दाखविण्यात येते. मनुष्य मात्र जेव्हा विचार करण्याच्या वयात येतो तेव्हा ईश्वराकडून आवाहनाद्वारे सूचित करण्यात येते की काय आणि कशापद्धतीने कार्य करावयाचे आहे.

हा ईशसंदेश मानवापर्यंत पोहोचविण्याचे माध्यम म्हणजे पैगंबरत्व होय. जी व्यक्ती हा संदेश पोहचविते त्यास इस्लामी परिभाषेत रसूल, पैगंबर अथवा नबी वा प्रेषित असे म्हणतात. ईश्वर आपल्या मानवनिर्मितीपैकी एक उत्तम व सत्यशील दास निवडून त्याच्या अंत:करणावर आपला संदेश अवतरित करतो. अशा रितीने रसूल (पैगंबर) ही अशी व्यक्ती आहे जी प्रत्यक्ष ईश्वराकडून त्यांच्या प्रसन्नतेचे ज्ञान प्राप्त करुन इतर मनुष्यांना देते. पैगंबर, ईश्वर आणि मनुष्यांमध्ये असलेले एक माध्यम आहे जे त्यांना त्यांच्या वास्तविक ईश्वराशी जोडते.

## ईशप्रकाशना (वह्य) चे स्वरुप

आता आपण या विषयावर विचार करु या की एखाद्या विशेष व्यक्तीवर ईशप्रकाशना (वह्य) कशाप्रकारे अवतरित होत असते आणि वर्तमानकाळात ती ईशप्रकाशना (वह्य) कोणती आहे जिच्या माध्यमातून आपल्या ईशप्रसन्नतेचे ज्ञान प्राप्त होणे शक्य आहे.

हा विषय समजून घेण्याकरिता एक उदाहरण घेऊ या. मानवाने जी यंत्रे आणि अस्त्रे तयार केली आहेत ती बहुतांश सर्व लोखंडाचीच आहेत. लोखंडाचा इतिहास जर पाहिला तर आश्चर्य वाटते की मनुष्याने लोखंडाचा शोध कसा लावला. कारण मनुष्याला पूर्वी लोखंडाविषयी काहीच माहिती नव्हती व त्याने कशाप्रकारे जे विविध पदार्थांच्या स्वरुपात पृथ्वीवर इतरत्र विखुरलेले त्याचे कण होते, एकत्र करुन शुद्ध लोखंड प्राप्त केले.

इतर शोध आणि संशोधनाची हीच गोष्ट आहे. निश्चितच उमगतच नाही की या संशोधनाची वाट मानवी बुद्धीस कशाप्रकारे समजली? शेवटी ती काय शक्ती आहे जी अनुभव, प्रयोग आणि निरीक्षण करतेवेळेस एका वैज्ञानिकास त्यांच्या अंतिम लक्ष्यापर्यंत पोचविते आणि तेथे पोचल्यावर त्यास लाभदायक आणि योग्य परिणाम भेटतो? जी गोष्ट आपल्याला माहीत नव्हती, ती आपल्याला कशी माहीत झाली? तर या ज्ञानाचे साधन मुळात तीच ईशकृपा आहे जिला आपण वह्य अथवा ईशप्रकाशना असे म्हणतो. सर्वकाही जाणणारा आपल्याकडील प्रचंड ज्ञानातून थोडासा अंश त्यास देऊन टाकतो, ज्याला ज्ञान

नसते. हा मुळात वह्यचा प्राथमिक भाग असून नकळत स्वरुपात प्रत्येकाच्या वाट्याला येतो.

दुसऱ्या प्रकारची ईशप्रकाशना ही अधिक प्रगतीशील असून ती पूर्ण ज्ञान आणि माहितीसह येते. शिवाय केवळ अशा लोकांवरच अवतरते ज्यांना पैगंबरत्वासाठी निवडण्यात आलेले असते. मनुष्याला ज्ञान आणि जीवनपद्धत याच प्रकारच्या ईशप्रकाशनांच्या माध्यमातून प्रदान करण्यात येते.

वह्यची वास्तविकता आपण असे समजू शकतो की यापेक्षा अधिक मागणे ही अशी मागणी आहे जी मानवी सामर्थ्याबाहेर आहे. एका उडणाऱ्या विमानाला पृथ्वीपासून आकाशात बिनतारी संदेश पाठविले जातात आणि विमानात बसलेली वाहक माणसे ते स्पष्टपणे ऐकू शकतात. ही जीवनातील घटना आहे. मात्र आजही याविषयी पूर्णपणे युक्तिवाद सादर करणे शक्य झालेले नाही की ही घटना कशी घडते. हीच अवस्था त्या समस्त घटनांची आहे ज्या या जगात घडताना आपण पाहतो. त्यातील समस्त तथ्ये आणि वस्तुस्थितीचे आपल्याला केवळ संक्षिप्त स्वरुपाचेच ज्ञान असते. आपण एखादे तथ्य पूर्णपणे समजण्याचा प्रयत्न केला तर आपले सामर्थ्य आणि आकलन विवश होऊन बसते. असे निश्चितपणे जाणवू लागते की पूर्ण ज्ञान प्राप्त करणे आपल्या सामर्थ्याबाहेर आहे, अशा परिस्थितीत ईशप्रकाशनाविषयी हकीकत जाणून घेण्याची इच्छा बाळगणे म्हणजे स्वत:ची वास्तविकताच माहीत नसावी, असे आहे.

आज विज्ञानाने स्वीकारले आहे की समस्त वास्तविकतांची पूर्ण माहिती प्राप्त करणे मानवी सामर्थ्याबाहेर आहे. यासंबंधी प्रा. हायझेन बर्ग यांचे उदाहरण देता येईल. त्यांनी जो संदिग्धतेचा सिद्धान्त सादर केला त्याची व्याख्या करताना जेम्स जेन यांनी लिहिले आहे,

"पूर्वी विज्ञानाचा असा दृष्टिकोन होता की एखाद्या अणूत उदा. इलेक्ट्रॉनचे स्थान निश्चित रुपाने दाखविले जाऊ शकते आणि हेदेखील आपल्याला माहीत असते की विशिष्ट वेळी वायुमंडळाच्या आत त्याचे स्थान आणि गती काय आहे. याच माहितीसह बाह्य प्रभावी शक्तींचे ज्ञान जर मिळाले तर इलेक्ट्रॉन्सचे पूर्ण भविष्य निर्धारित करणे शक्य होईल. सृष्टीतील समस्त अणूसंबंधीची ही माहिती प्राप्त झाली तर संपूर्ण जगाविषयी भविष्यवाणी करणे शक्य होईल."

मात्र हायझेन बर्ग यांच्या व्याख्येनुसार वर्तमान विज्ञान इथपर्यंत पोचले आहे की या संशोधनात निसर्गनियम अडचणी निर्माण करीत आहेत. जर आपल्याला माहीत झाले की विद्युत अणू हे वायूमंडळाच्या कोणत्या स्थानावर आहेत, तरीसुद्धा आपण हे सांगू शकत नाही की तो किती वेगाने भ्रमण करीत आहे. निसर्ग मुळात सीमान्त विभ्रमाची (मार्जीन ऑफ एरर) आज्ञा देतो, मात्र जर आपणास या सीमान्तात दाखल व्हायचे असेल तर निसर्गातर्फे कोणतीही मदत मिळत नाही. वरवर दिसायला तर असे वाटते की निसर्ग हा खऱ्या

मोजमापापासून पूर्णत: अनभिज्ञ आहे. याचप्रमाणे आपणास एखाद्या विद्युत अणूची खरी गती माहीत असली तरी निसर्ग आपल्याला वायूमंडळाच्या आतील त्याचे खरे स्थान माहीत होऊ शकत नाही, जणू विद्युत अणूचे स्थान आणि त्याची क्रिया एखाद्या कंदीलाच्या काचेच्या दोन भिन्न भागांवर अंकित आहे. जर काचेला एखाद्या नादुरुस्त कंदीलावर ठेवले तर आपण फक्त निम्मा भाग प्रकाशात आणू शकतो आणि विद्युत अणूचे स्थान आणि क्रिया या दोन्ही बाबी काही प्रमाणातच पाहू शकतो. मात्र चांगल्या कंदीलाच्या माध्यमाने असे होणे शक्य नाही. कारण आपण एकावर जितका जास्त प्रकाश टाकू तेवढेच दुसरे अस्पष्ट होत जाते. नादुरुस्त कंदील हे प्राचीन विज्ञान असून यामुळे आपण या भ्रमात सापडलो आहोत की जर आपल्याकडे चांगला कंदील असेल तर आपण एखाद्या प्रसंगी अणूचे स्थान आणि गतीचे उत्तम रितीने अनुमान लावू शकतो. याच भ्रमामुळे विज्ञानात निश्चयतावाद दाखल झाला. मात्र आज विज्ञानाकडे जास्त चांगले कंदील उपलब्ध असूनही त्यातून आपल्याला फक्त एवढेच दिसते की परिस्थिती आणि क्रियानिर्धारण हे वास्तविकतेचे दोन विभिन्न पैलू असून एकाच वेळी त्यांना स्पष्ट करणे शक्य नाही. (मॉडर्न सायंटिफिक थॉट्स, पृ.७-१८)

या बाबतीत शेवटचा प्रश्न असा आहे की ईशप्रकाशना वेगवेगळ्या काळात मनुष्यांकडे येत असते. त्यांपैकी कोणत्या ईशप्रकाशनांचे आजच्या मानवांनी पालन करणे गरजेचे आहे? याचे उत्तर अत्यंत स्पष्ट आहे. नंतरच्या लोकांनी याच ईशप्रकाशनेचा स्वीकार करणे योग्य आहे, जी सर्वात शेवटी आलेली आहे. एखादे शासन इतर देशात आपला दूत पाठविते तेव्हा त्याचे दूतत्व तात्कालीन काळापुरतेच असते. जोपर्यंत तो आपल्या पदावर आरुढ असतो तोपर्यंतच त्याचे दूतत्व असते त्याचा कार्यकाळ संपल्यावर मात्र दुसऱ्या व्यक्तीस दूत म्हणून पाठविण्यात आल्यावर तोच शासनाचा दूत समजला जातो. जो शेवटी दूत असतो त्याचेच दूतत्व स्वीकारण्यात येते.

या अनुषंगाने ईश्वराचे अंतिम दूत मुहम्मद (स.) असून ते जग अस्तित्वात असेपर्यंत समस्त जगातील मानवतेच्या मार्गदर्शनासाठी पैगंबर म्हणून पाठविण्यात आलेले आहेत. त्यांच्यानंतर आता कधीही कोणताही पैगंबर येणार नसून त्यांचेच मार्गदर्शन हे अंतिम मार्गदर्शन होय. पैगंबर मुहम्मद (स.) हे सर्वांत शेवटी अवतरित होण्याचे पर्याप्त कारण असे की त्यांना वर्तमान आणि भविष्यासाठी ईश्वराचे प्रतिनिधी स्वीकारण्यात यावे व त्यांचेच मार्गदर्शन स्वीकारुन जीवनाची वाटचाल करावी. कारण नंतरच्या काळात येणारा पैगंबर आपल्या पूर्वीच्या समस्त पैगंबरांच्या शिकवणीचे खरे स्वरुप ठरवू शकतो. मात्र पूर्वी होऊन गेलेला कोणताही पैगंबर नंतरच्या पैगंबराचे प्रतिनिधित्व रद्दबातल ठरवू शकत नाही.

हीसुद्धा शक्यता आहे की मानव इतिहासातील सर्वात प्राचीन आणि आरंभिक धार्मिक ग्रंथ ऋग्वेद ईशआदेशानुसार संपादित झाला असावा जसे बायबल हा ग्रंथ अपेक्षत:

मध्यकालीन ग्रंथ आहे. मात्र आता हे समस्त ग्रंथ कालबाह्य आणि रद्दबातल ठरले आहेत. यापैकी कोणताही ग्रंथ स्वत:स अंतिम स्वरुपात प्रस्तुत करीत नाही. मात्र शेवटचा ग्रंथ कुरआन मागील समस्त ग्रंथ कालबाह्य ठरवितो.

## इस्लामचा थोडक्यात परिचय

आपल्याला आणि आपल्या भावी पिढीला अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कोणता संदेश दिला? इस्लामचा हा संदेश चार शीर्षकांखाली एकत्र करता येईल- १) ईश्वराची खरी संकल्पना, २) मानवाच्या निर्मितीचा उद्देश आणि सृष्टीशी त्याचा संबंध, ३) मानवाने ईश्वराशी संबंध जोडण्यासाठी काय करावे? ४) व्यक्तिगत आचरण आणि सामाजिक कायदा काय असावा?

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितलेली सर्वांत महत्त्वाची जी गोष्ट म्हणजे या सृष्टीचा एकच प्रभू असून तो फक्त ईश्वरच आहे. ईश्वरासम कोणीही नसून तोच सर्वकाही करु शकतो, सर्व प्रकारची शक्ती आणि सामर्थ्य त्यालाच आहे. केवळ तोच समस्त घटना अस्तित्वात आणीत आहे. इस्लामी दृष्टिकोनानुसार ईश्वराची धारणा संक्षिप्त पण पूर्णरुपाने प्रस्तुत करणारी कुरआनची आयत अशी,

"अल्लाह तो चिरंतनजीवी आहे ज्याने तमाम सृष्टीचा भार सांभाळलेला आहे, त्याच्याशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही, तो झोपतही नाही आणि त्याला गुंगीही येत नाही, पृथ्वी आणि आकाशांत जे काही आहे त्याचेच आहे. असा कोण आहे जो त्याच्या पुढे त्याच्या परवानगीशिवाय शिफारस करु शकेल? जे काही दासाच्या समक्ष आहे त्यालाही तो जाणतो आणि जे काही त्यांच्यापासून अदृश्य आहे त्यालाही तो जाणतो आणि त्याच्या माहितीपैकी कोणतीही गोष्ट दासाच्या बुद्धिकक्षेत येऊ शकत नाही याव्यतिरिक्त की एखाद्या गोष्टीचे ज्ञान तो स्वत:च त्यांना देऊ इच्छित असेल. त्याचे राज्य आकाश आणि पृथ्वीवर पसरले आहे, आणि त्यांचे संरक्षण काही त्याला थकवून सोडणारे काम नव्हे. फक्त तोच एकटा महान व श्रेष्ठ आहे.'
(दिव्य कुरआन, २:२५५)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दिलेली दुसरी शिकवण मनुष्याच्या निर्मितीचा उद्देश आणि सृष्टीशी त्याचा संबंध असण्याविषयी आहे. मनुष्यास यासाठी जन्म देण्यात आला आहे की त्यांची परीक्षा घ्यावी. मनुष्यास आचरणस्वातंत्र्य अथवा कर्मस्वातंत्र्य देऊन ईश्वराने आपली प्रसन्नता पाठविली आहे. आता ईश्वरास हे पाहावयाचे आहे की कोण त्याची प्रसन्नता प्राप्त करतो, कोण त्याच्या मर्जीनुसार चालतो आणि कोण त्याची अवज्ञा करतो. सृष्टीशी मनुष्याचा जो संबंध आहे तोदेखील याच उद्दिष्टाच्या अंतर्गत आहे. ही सृष्टी एखादे राष्ट्र, शासक वा विशेष व्यक्तीची जागीर नसून मनुष्यास आपले कर्तव्य पूर्ण करण्यास मदत

मिळावी यासाठी आहे. ही सृष्टी कर्मक्षेत्र आहे. येथे राहून आपल्याला परीक्षा द्यायची आहे. या परीक्षेची मुदत आयुष्यभर आहे. तसेच समस्त मानवतेची मुदत ही मानवजन्माची मालिका सुरु असेपर्यंत आहे. यानंतर या सृष्टीचा स्वामी ईश्वर सर्वांना एकत्र करुन प्रत्येकास त्याच्या त्याच्या भल्या बुऱ्या कर्मांनुसार परीक्षेचे निकालपत्र देईल. परीक्षेत उत्तीर्ण झालेल्यांना अतिमहान बक्षीस देण्यात येईल आणि अनुत्तीर्ण झालेल्यांना शिक्षा. हे बक्षीस आणि शिक्षा मिळण्याचे ठिकाण स्वर्ग आणि नरक आहे.

याच धारणेचे नाव परलोक आहे. वर्तमान जीवन खऱ्या अर्थाने मनुष्याच्या वास्तविक जीवनाचा आरंभ असून पारलौकिक जीवन अंत होय. अशाप्रकारे ईश्वराने आपल्याला भविष्यासंबंधी सूचना दिली. पारलौकिक जीवन हे परोक्षात ठेवण्यात आलेले आहे. कारण आपण परीक्षण अवस्थेत सारण्याकरिता याची गरज आहे. मात्र जेव्हा परीक्षेची मुदत संपेल तेव्हा परोक्षातील विश्व आपल्यासमोर प्रकट करण्यात येईल. या इहलोकी जीवनात आपल्याला केवळ एकच जीवन दिसत आहे, मात्र या जीवनात दिसणाऱ्या प्रत्येक वस्तूची वास्तविकता केवळ इतकीच नाही जेवढी आपल्या दिसत आहे. दिसायला तर सूर्याचा प्रकाश एक पिवळसर चमकणारी वस्तू आहे. मात्र वस्तुत: हा प्रकाश सात रंगाचा संगम आहे. परंतु या सात रंगांपैकी एकही रंग आपल्याला या चमकणाऱ्या पिवळसर किरणांत दिसत नाही. अगदी याचप्रमाणे आपल्या वर्तमान जीवनातही आणखीन एक जीवन लपलेले आहे, मात्र ते आपल्याला दिसत नाही. मृत्युनंतर ते अगदी आपल्यासमोर स्पष्ट होईल.

पारलौकिक जीवन एकमात्र अलौकिक सिद्धान्त नसून इहलोकाचाच पुढील भाग आहे. इतिहास साक्षी आहे की ज्या ज्या वेळी मनुष्य ईश्वरास विसरला त्या वेळी मनुष्याने इतरांवर अत्याचार केला. मानवतेस रक्तबंबाळ केले. या ईशद्रोही माणसाला या दुराचारापासून रोखणारी कोणतीही वस्तू जगात नाही. ज्या लोकांनी केवळ कायदा करुन सुधारणेचे कार्य केले त्यांच्या सुधारणा कार्यामुळे सुधारणा तर घडली नाही, फक्त अन्याय व अत्याचारांच्या स्वरुपात बदल घडला. वास्तविक मनुष्यामध्ये मार्गभ्रष्टतेपासून बचाव करुन सदाचाराच्या मार्गावर चालण्याची भावना निर्माण होईल तेव्हाच सुधारणा शक्य आहे. ही भावना निर्माण करणारी वस्तू कोणती आहे? तर आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा ईश्वरासमोर जाब देण्याची आणि कर्मानुसार त्यांचे फलित मिळण्याची जाणीवच ही भावना निर्माण करु शकते. कारण याशिवाय पर्यायच नाही. सदाचारी आणि न्यायप्रिय होण्यासाठी या जाणिवेशिवाय इतर कोणताही पर्याय उपलब्ध नाही.

काहींच्या मते पारलौकिक धारणा ही केवळ काल्पनिक बाब आहे. मात्र ज्या पुराव्यांच्या आधारांवर पारलौकिक जीवनास काल्पनिक जीवन असल्याचे म्हटले जाते

त्यावर विश्वास ठेवला तर हे मान्य करणे आवश्यक ठरते की आपले हे अस्तित्वसुद्धा काल्पनिकच आहे. अर्थात हेच या पुराव्यांच्या आधारावर सिद्ध होते की आपले अस्तित्व, आपले जीवन आणि ही प्रचंड सृष्टीसुद्धा एक काल्पनिक बाब आहे. पारलौकिक जीवन जर काल्पनिक असेल तर ते आपल्याकरिता इतके महत्त्वपूर्ण का आहे? असे का वागावे की याशिवाय आपण कोणत्याही प्रकारची सामाजिक व्यवस्था उभारु शकत नाही? मानवाच्या विचारातून ही धारणा काढून घेतल्यावर आपले संपूर्ण जीवन का भ्रष्ट होते? मग खरोखरच एखादी काल्पनिक धारणा आपल्या जीवनासाठी इतकी आवश्यक असावी का? विचार करा, या जगात असे एकही उदाहरण सापडते काय की एक वस्तू खरोखरच अस्तित्वात नसावी मात्र तरीसुद्धा तिची वास्तविकता आणि महत्त्व इतके अपार व्हावे! जीवनाशी कसलाही संबंध नसतानासुद्धा ती जीवनाचा अविभाज्य भाग व्हावी! म्हणजे जीवनाच्या खऱ्या आणि न्यायपूर्ण रचनेकरिता पारलौकिक जीवनाची अनिवार्यता असणे हेच खुद्द या गोष्टीचा सबळ पुरावा आहे की 'पारलौकिक जीवन हे या सृष्टीचे सर्वांत महान तथ्य आहे.' जरी डोळ्यांनी दिसत नसले तरीसुद्धा डोळ्यांनी दिसणाऱ्या समस्त वस्तूंपेक्षाही अत्याधिक स्पष्ट आहे. बुद्धी ठेवणारी कोणतीही व्यक्ती हे तथ्य नाकारु शकत नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जी तिसरी गोष्ट स्पष्ट केली ती म्हणजे माणसाने ईश्वराशी आपला संबंध जोडण्याकरिता काय करावे? याबाबतीत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ईशस्मरण, ईशभक्ती आणि बलिदान.

ईशस्मरणाचे तात्पर्य असे की ईश्वराशी असलेल्या आपल्या संबंधाचा आपल्याला कोणत्याही क्षणी विसर पडता कामा नये. ईश्वरास त्याच्या समस्त शक्ती, सामर्थ्य व वैशिष्ट्यांसह स्मरण करावे, अगदी अशाप्रकारे स्मरण करावे जसे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले. ईशभक्ती ही मुख्य रुपाने शारीरिक कार्य असून इस्लामी विधीत यासाठीच नेमण्यात आले आहे की माणसाच्या भौतिक अवस्थेवर त्याच्या आध्यात्मिक अवस्थेचा प्रभाव पडावा आणि त्याच्याकडून असे कार्य घडावे जे मानसिक रुपाने त्यास ईश्वराच्या जवळ करणारे असेल. बलिदान म्हणजे आपल्या भावना, आपले प्राण आणि आपली संपत्ती ईशमार्गात खर्च करणे होय. मनुष्य जेव्हा आपल्या प्रिय वस्तू ईश्वराच्या नावावर अर्पण करतो तेव्हा जणू तो आपल्या भावनाच ईश्वरास पूर्णतः समर्पित करतो, आपल्या आवडीनिवडी शेवटपर्यंत ईश्वराच्या मर्जीनुसार वळविण्याचा प्रयत्न करतो. अशाप्रकारे बलिदान हे मनुष्यास ईश्वराच्या समीप करते.

हे ईशस्मरण, ईशभक्ती आणि बलिदान वेगवेगळ्या बाबी नसून एकाच वास्तविकतेची विभिन्न रुपे आहेत. हे आपल्या पालनकर्त्याशी घनिष्ट संबंध असल्याचे प्रदर्शन होय. ईशभक्त जेव्हा आपल्या प्रिय स्वामीचे (ईश्वराचे) आपल्या अंतकरणात व

मुखाने स्मरण करतो, त्यास ईशस्मरण म्हणतात. मनुष्य जेव्हा आपल्या भावनांसहित आपले मस्तक ईश्वरासमोर टेकतो, त्यास ईशभक्ती म्हणतो आणि जेव्हा तो आपले तन, मन, धन व सर्वस्व ईश्वराकरिता समर्पित करतो त्यासच आपण बलिदान म्हणतो. पैगंबर याच तिन्ही कर्मांच्या पद्धती दाखवितात आणि याकरिता माणसास तयार करतात.

चौथी बाब वैयक्तिक आचरण आणि सामाजिक नियम होय. यासंबंधी सविस्तर सूचना देण्यात आल्या आहेत. एका कर्तव्यपरायण आणि सत्यनिष्ठ जीवनासाठी ज्या सत्यनियम वा तत्त्वांची गरज असते ते सर्वच सविस्तरपणे दर्शविण्यात आले आहेत. मात्र एक गोष्ट नक्की की केवळ वैयक्तिक स्वरुपाच्या उपदेशाने सामाजिक सुधारणा घडविणे शक्य नाही. तसेच हेसुद्धा शक्य नाही की सुधारणा झालेले लोक कायमस्वरुपी सदाचाराच्याच मार्गावर राहतील व कधीही दुराचाराकडे ढुंकूनही पाहणार नाही. याकरिताच अगदी व्यापक स्वरुपाचा सामाजिक नियमसुद्धा आपल्याला ईश्वराने प्रदान केला, जेणेकरुन या नियमाच्या आधारावर राज्याची निर्मिती करावी आणि सामाजिक स्तरावर ईश्वराची प्रसन्नता कायम राहावी. दुसऱ्या शब्दांत इस्लाम केवळ एखादी व्यक्ती अथवा काही मोजक्या लोकांनाच ईशवादी बनवू इच्छित नसून समस्त मानवजातीतच अशी क्रांती घडवून आणतो, ज्यामुळे व्यक्तिगत आणि सामाजिक जीवनातील सर्व प्रतिकूल परिस्थिती नष्ट होऊन सर्वांनी मिळून सामूहिकरित्या ईश्वराचे आज्ञापालन करावे.

हे असे वैशिष्ट्य आहे, जे समस्त धर्मांपैकी केवळ इस्लामलाच प्राप्त आहे. ईश्वर आणि त्याच्याशी संबंधित इतर अलौकिक धारणांचा जर विचार केला तर या धारणा इतर धर्मांतसुद्धा काही न काही स्वरुपात आहेतच. मात्र जर हा प्रश्न विचारण्यात आला की एखाद्या धर्माकडे अशी एखादी सामाजिक रचना अगर संविधानप्रणाली आहे काय, जिच्या आधारावर राज्याची उभारणी करणे शक्य असावे, तर त्याच्या उत्तरात इस्लामव्यतिरिक्त कोणत्याही धर्माचे नाव घेणे शक्य नाही. इस्लामकडे ते भौतिक कायदे आणि नियमसुद्धा मूळ स्वरुपात सुरक्षित आहेत, जे ईश्वराने मानवाच्या मार्गदर्शनासाठी प्रदान केले आणि या वैधानिक आधारावरच जी सामाजिक व्यवस्था निर्माण करण्यात आली, तिचा पूर्ण अहवालसुद्धा सुरक्षित आहे. हे ईश्वराचे असे बहुमूल्य अनुग्रह आहे, जे स्वीकारले तर मानव हा समस्त अडचणी व संकटांच्या विळख्यातून पूर्णतः मुक्त होईल, हे निश्चित!

-०- समाप्त -०-